आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील निधी वितरण. (अनिवार्य खर्च-वेतन)

**महाराष्ट्र शासन.**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०१ / कार्यासन-६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- ६ जुलै, २०२०.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४ /अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, समक्रमांक, दि.२१.०४.२०२०, दि.८.०५.२०२० व दि.५.०६.२०२०.

## शासन निर्णय-

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १६ एप्रिल,२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता (जून, २०२० अखेर) अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली होती. यास अनुसरून वित्त विभागाने अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिल्यानुसार संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्रमांक टी-२ व टी-४ मधील अनिवार्य खर्चाच्या योजनांकरिता ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या बाबींकरीता एकूण २५ टक्के निधी संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्यात आला आहे.

सद्यस्थितीत वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता एकूण अर्थसंकल्पित तरतूदींच्या ३५ टक्क्यांच्या मर्यादेतील निधी वितरणासाठी उपलब्ध करून देण्यात आला आहे. ही बाब विचारात घेऊन सोबतच्या विवरणपत्रात नमूद **मागणी क्रमांक टी-२ व टी-४ मधील अनिवार्य खर्चाच्या योजनांकरिता ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांच्या वितरणासाठी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर ३५ % मर्यादेतील उपलब्ध तरतूदींपैकी उर्वरीत १० टक्के निधी संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्यास व खर्च करण्यास शासन मान्यता** देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील काही कालावधीसाठी राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. सदर निधीचा वापर कोणतीही प्रलंबित थकबाकी (Arrears) अदा करण्यासाठी न करता नियमित वेतन अदायगीसाठीच करण्यात यावा.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी स्तंभ क्र. ५ मध्ये दर्शविलेल्या तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना वितरीत कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६०५१८२९२४३६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.07.06 16:45:53 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.
६. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक.
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
८. उपसंचालक, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र पडताळणी समिती(सर्व).
९. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
१०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४ व अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई
१३. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
१५. निवड नस्ती (का-६).

| शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२०/ प्र.क्र.०१/ कार्यासन-६, दि.६ जुलै,२०२० सोबतचे विवरणपत्र | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (रू. हजारात) |
| अ. क्र. | मागणी क्रमांक / मुख्य लेखाशिर्ष | बाब/उद्दिष्ट | २०२०-२१ साठीची अर्थसंकल्पिय तरतूद | वितरित करण्यात येत असलेली १० % तरतुद | नियंत्रक अधिकारी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | **मागणी क्र.टी-२** | | | | |
| | **२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण,०२-अनुसूचित जमातीचे कल्याण,** | | | | |
| | **(००१) संचालन व प्रशासन** | | | | |
| १ | (००) (०१) आदिवासी विकास आयुक्तालय (अनिवार्य खर्च) **(२२२५ १०२५)** | ०१-वेतन | ६३६८१.०० | ६३६८.१० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| २ | (००) (०२) प्रादेशिक कार्यालये-जनजाती विकास आयुक्त. (अनिवार्य खर्च) **(२२२५ १०३४)** | ०१-वेतन | १०११५३.०० | १०११५.३० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ३ | (००) (०३) प्रकल्प अधिकारी (अनिवार्य खर्च) **(२२२५ १०४३)** | ०१-वेतन | ४५२७०४.०० | ४५२७०.४० | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ४ | (००) (०४) एकात्मिक क्षेत्र विकास कार्यक्रम (अनिवार्य खर्च) **(२२२५ १०५२)** | ०१-वेतन | ७५१७.०० | ७५१.७० | आयुक्त, आदिवासी, संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे. |
| | **०५- संशोधन व प्रशिक्षण,** | | | | |
| ५ | (०५) (०१) जनजाती संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे (अनिवार्य खर्च) **(२२२५ १३०१)** | ०१-वेतन | ४३२११.०० | ४३२१.१० | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| | **एकूण मागणी क्रमांक टी-२** | | **६६८२६६.००** | **६६८२६.६०** | |
| | **मागणी क्रमांक टी-४** | | | | |
| | **२२५१- सचिवालय-सामाजिक सेवा,** | | | | |
| | **०९०- सचिवालय** | | | | |
| ६ | (००) (०१) आदिवासी विकास विभाग **(२२५१ ०२११)** | ०१-वेतन | १३२७५१.०० | १३२७५.१० | उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई |
| | **एकूण मागणी क्रमांक टी-४** | | **१३२७५१.००** | **१३२७५.१०** | |
| | **एकूण टी-२+टी-४** | | **८०१०१७.००** | **८०१०१.७०** | |